राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रमांतर्गत प्रिंकिंग लॅन्सेट खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र. ३९५/आरोग्य-८**

नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: १८ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ-**

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/साथरोग कक्ष-६/ प्रिंकिंग लॅन्सेट खरेदी/प्रशासकीय मान्यता/ न.क्र. ५५/१८५५-५७/२०१६, दिनांक १५.१०.२०१६

२) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/किजरो/जाहिर निविदा/प्रिंकिंग लॅन्सेटची प्रस्ताव भांडार-३/ न.क्र./३०७११-१२ /१६, दिनांक ०६.१०.२०१६

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रमांतर्गत प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष सर्वेक्षणामध्ये हिवतापाच्या निदानासाठी रुग्णांच्या रक्तनमुन्यांची प्रयोगशाळेत तपासणी केली जाते. रक्तनमुने घेण्यासाठी प्रत्येक रुग्णास स्वतंत्र प्रिंकिंग लॅन्सेटची आवश्यकता असते. अशाप्रकारे राष्ट्रीय हिवताप नियंत्रण कार्यक्रमासाठी व १२ बिगर आदिवासी जिल्हा हिवताप अधिकारी यांच्यासाठी एका वर्षात सरासरी ६०,५८,३२९ नग प्रिंकिंग लॅन्सेटची आवश्यकता आहे. त्यापैकी एकुण ३०,२९,१६४ नग प्रिंकिंग लॅन्सेटची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार प्रिंकिंग लॅन्सेटची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक १५.१०.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रमांतर्गत एकूण ३०,२९,१६४ नग प्रिंकिंग लॅन्सेटची खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) प्रिंकिंग लॅन्सेटची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.

२) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- केंद्र पुरस्कृत योजना-(राज्य हिस्सा)- (०१) (४७) राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रम- २१ पुरवठा व सामग्री (२२१० ५१५७)" या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३) प्रिंकिंग लॅन्सेटचे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१५ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

६) निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यांनतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१२२३३४४५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Sumant Kulkarni

Digitally signed by Ganesh Sumant Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ganesh Sumant Kulkarni
Date: 2016.11.18 16:48:02 +05'30'

( ग.सु.कुलकर्णी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११) निवडनस्ती (आरोग्य-८)